**महाराष्ट्र लोकसेवा हक्क अधिनियम -२०१५ अंतर्गत "औरंगाबाद महानगर प्रदेश विकास प्राधिकरणातील" लोकसेवा, नियत कालमर्यादा, पदनिर्देशित अधिकारी, प्रथम व व्दितीय अपिलीय अधिकारी अधिसुचित करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## नगर विकास विभाग

**शासन निर्णय क्रमांकः एमआरडी-३३२२/१५४०/प्र.क्र.२०५/नवि-७**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक : २६ जुलै, २०२३

**संदर्भ** – महाराष्ट्र लोकसेवा हक्क अधिनियम २०१५, दिनांक २८.०४.२०१५

**प्रस्तावना :-**

राज्यातील पात्र व्यक्तींना पारदर्शक, कार्यक्षम व समयोचित लोकसेवा देण्याकरिता तसेच लोकांच्या स्थानिक प्रशासनाकडून वाढत्या अपेक्षा विचारात घेऊन त्यांना तत्पर व दर्जेदार सेवा पुरविण्याच्या दृष्टिकोनातून महाराष्ट्र लोकसेवा हक्क अध्यादेश-२०१५, दि.२८.०४.२०१५ रोजी महाराष्ट्र राज्यास लागू करण्यात आला आहे. या अध्यादेशातील कलम-३ मध्ये नमूद करण्यात आल्यानुसार प्रत्येक सार्वजनिक प्राधिकरणाने अध्यादेश लागू झाल्यानंतर ३ महिन्याच्या कालावधीच्या आत आणि त्यानंतर वेळोवेळी ते पुरवित असलेल्या लोकसेवा, पदनिर्देशित अधिकारी, प्रथम व व्दितीय अपिलीय अधिकारी आणि नियत कालमर्यादा या अध्यादेशाखाली अधिसुचित करणे आवश्यक आहे. त्यानुसार औरंगाबाद महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाकडील सेवांसाठी नियत कालमर्यादा, पदनिर्देशित अधिकारी, प्रथम व व्दितीय अपिल अधिकारी अधिसुचित करण्याची बाब शासनाचे विचाराधीन होती. याबाबत शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

१) महाराष्ट्र लोकसेवा हक्क अधिनियम २०१५ मधील तरतुद ३ नुसार औरंगाबाद महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाकडील अनुसूची -अ॰ मधील सेवा या आदेशान्वये अधिसुचित करण्यास शासनाची मान्यता देण्यात येत आहे. नगर विकास विभागांतर्गत औरंगाबाद महानगर प्रदेश विकास प्राधिकरणामार्फत देण्यात येणाऱ्या सेवांसाठी लोकसेवेचा कालावधी, सेवा अधिसूचीत करणारे कार्यालय तसेच पदनिर्देशित अधिकारी, प्रथम अपिलीय अधिकारी, व्दितीय अपिलीय अधिकारी याबाबतचा तपशिल अनुसूची -अ॰ मध्ये नमूद करण्यात आलेला आहे. त्यानुषंगाने सदर सेवा शासनाच्या राजपत्रात अधिसूचित करण्याबाबत कार्यवाही औरंगाबाद महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाने करावी.

२) अनुसूची -अ॰ मध्ये नमुद सेवा देण्यास जबाबदार पदनिर्देशित अधिकारी, प्रथम व व्दितीय अपिल अधिकारी यांनी नागरिकांना विहीत मुदतीत सेवा उपलब्ध करून देण्याची कार्यवाही करावी.

३) अनुसूची -अ◦ मध्ये नमुद सेवांच्या तपशिल औरंगाबाद महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाच्या प्रत्येक कार्यालयाच्या फलकावर सुवाच्य अक्षरात ठळकपणे प्रदर्शित करावा.

४) अनुसूची -अ◦ मध्ये नमुद सेवा “आपले सरकार” च्या वेबपोर्टलवरील Dashboard of Right to service वर “महाआयटी” च्या मदतीने उपलब्ध करून देण्यात याव्यात.

५) “महाआयटी” मार्फत औरंगाबाद महानगर प्रदेश विकास प्राधिकरणाकडील संबंधीत पदनिर्देशीत अधिकाऱ्यांना “युजरआयडी” व “पासवर्ड” उपलब्ध करून देण्यात यावा. तसेच सदर सेवा “आपले सरकार” पोर्टल वरून उपलब्ध करून देणेसाठी तांत्रिक सहाय्य करण्याची जबाबदारी “महाआयटी” यांची राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०७२६१६०२२१२७२५ असा आहे. सदरहू शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VIJAY KARBHARI CHAUDHARI

Digitally signed by VIJAY KARBHARI CHAUDHARI
DN: CN = VIJAY KARBHARI CHAUDHARI, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = URBAN DEVELOPMENT DEPARTMENT
Date: 2023.07.27 11:14:20 +05'30'

**( विजय चौधरी )**
**उप सचिव महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य,यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,मंत्रालय, मुंबई.
३. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
४. प्रधान सचिव (नवि-१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई
७. प्रधान सचिव ( नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
८. महानगर आयुक्त, औरंगाबाद महानगर प्रदेश विकास प्राधिकरण,मुंबई.
९. संचालक, नगर रचना आणि मुल्यनिर्धारण विभाग, पुणे.
१०. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)-१/२, मुंबई / नागपुर
११. महालेखापाल, (लेखापरिक्षा)-१/२, मुंबई/ नागपुर
१२. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई
१३. अभिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१४. उप सचिव ( नवि-३०), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१५. उप सचिव (नवि-७), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
१६. निवड नस्ती (नवि-७)

**औरंगाबाद महानगर प्रदेश विकास प्राधिकरण**
**विभागीय आयुक्त कार्यालय, दिल्ली गेट,औरंगाबाद — ४३१ ००१**
**महाराष्ट्र लोकसेवा हक्क अधिनियम — २०१५**
**विकास परवानगी विभाग**
**अनुसूची “अ”**

| अनुक्रमांक | अधिसूचित करावायच्या लोकसेवांचा तपशिल | आवश्यक कागदपत्र | शुल्क | सेवा पुरविण्यासाठीची कालमर्यादा | पदनिर्देशित अधिकारी पदनाम | प्रथम अपिलीय अधिकारी | व्दितीय अपिलीय अधिकारी |
|---|---|---|---|---|---|---|---|
| १. | २. | ३. | ४. | ५. | ६. | ७. | ८. |
| १ | अभिन्यास / इमारत बांधकाम परवानगी | UDCPR, २०२० ( एकत्रिकृत विकास नियोजन व प्रोत्साहन नियमावली-२०२० नुसार ) तसेच शासनाद्वारे वेळोवेळी प्रसिद्ध करण्यात आलेले शासन निर्णयानुसार सदरची माहीती ही प्राधिकरणाच्या संकेतस्थळावर उपलब्ध आहे. | प्राधिकरणाने / शासनाने वेळोवेळी निश्चित केलेले दर | ३० दिवस | सहायक नियोजनकार | नियोजनकार | उपमहानगर नियोजनकार |
| २ | जोता मोजणी प्रमाणपत्र | | | ०७ दिवस | सहायक नियोजनकार | नियोजनकार | उपमहानगर नियोजनकार |
| ३. | भोगवटा प्रमाणपत्र | | | ०८ दिवस | सहायक नियोजनकार | नियोजनकार | उपमहानगर नियोजनकार |
| ४. | झोन दाखला | | | ०७ दिवस | सहायक नियोजनकार | नियोजनकार | उपमहानगर नियोजनकार |
| ५. | भाग नकाशा/नकाशा देणे | | | ०३ दिवस | सहायक नियोजनकार | नियोजनकार | उपमहानगर नियोजनकार |

VIJAY KARBHARI CHAUDHARI

Digitally signed by VIJAY KARBHARI CHAUDHARI
DN: CN = VIJAY KARBHARI CHAUDHARI, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = URBAN DEVELOPMENT DEPARTMENT
Date: 2023.07.27 11:14:38 +05'30'

( विजय चौधरी )
उप सचिव महाराष्ट्र शासन

## TOWN & COUNTRY PLANNING DIVISION

| Sr.No. | Services | Necessary documents | Fees | Time Limit to Provide Services | Nominated Designation | First Appellate Authority | Second Appellate Authority |
|---|---|---|---|---|---|---|---|
| 1 | Building Commencement Certificate | UDCPR,2020 As well from time to time by government promulgated according to the government decision, this information is available on website of authority. | Rate prescribed by MMRDA/ Govt. from time to time. | 30 Days | Assistant Planner | Planner | Deputy Metropolitan Planner |
| 2 | Plinth Checking Certificate | | | 07 Days | Assistant Planner | Planner | Deputy Metropolitan Planner |
| 3 | Occupation Certificate | | | 08 Days | Assistant Planner | Planner | Deputy Metropolitan Planner |
| 4 | D.P. Remarks | | | 07 Days | Assistant Planner | Planner | Deputy Metropolitan Planner |
| 5 | Copy of Part Plan/ Plan | | | 03 Days | Assistant Planner | Planner | Deputy Metropolitan Planner |

VIJAY KARBHARI CHAUDHARI

Digitally signed by VIJAY KARBHARI CHAUDHARI
DN: CN = VIJAY KARBHARI CHAUDHARI, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = URBAN DEVELOPMENT DEPARTMENT
Date: 2023.07.27 11:14:55 +05'30'

( विजय चौधरी )
उप सचिव महाराष्ट्र शासन